तालुका स्तरावर समुपदेशन केंद्र सुरु करण्यासाठी प्राप्त होणा-या प्रस्तावांची छाननी करण्यासाठी जिल्हास्तरीय समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- २००९/प्र.क्र. ३०६ /का-२,
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.

**दिनांक : १ मार्च, २०११**

**वाचा :-** आयुक्त, महिला व बाल विकास यांचे पत्र क्र. मबाविआ/समुपदेशन केंद्रे/छाननी समिती /७५०६, दि. ११.११.२०१० व क्र. मबाविआ/समुपदेशन केंद्रे/छाननी समिती /८१२९, दि. ९.१२.२०१०

**शासन निर्णय :-** मा. मुंबई उच्च न्यायालयाने क्रिमीनल अपील नबंर ३५९/२००८ मध्ये The Government of Maharashtra shall creat more Counselling Centers (Special Cell ) for women and children at taluka level in a phased manner याप्रमाणे निर्देश दिले आहेत. राज्यात प्रत्येक जिल्हयातील महिला व बालकांवर अत्याचाराच्या प्रकरणांची ज्या तालुक्यात संख्या जास्त आहे अशा ३ तालुक्यांची नांवे व त्या ३ तालुक्याच्या ठिकाणी महिला व बालकांवर होणा-या अत्याचारास प्रतिबंध करण्यासाठी महिला समुपदेशन केंद्रे नव्याने सुरु करण्यासाठी जागा उपलब्ध होवू शकेल काय यासाठी सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना माहिती संकलीत करण्याबाबत आयुक्तालयाने निर्देश दिले आहेत. समुपदेशन केंद्र योजनेअंतर्गत जिल्हा स्तरावर जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना महिला व बालकांवर होणा-या अत्याचारांना प्रतिबंध करण्यासाठी तालुका स्तरावर समुपदेशन केंद्र सुरु करण्यासाठी प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर छाणणी कामी अधिक पारदर्शकता आणण्यासाठी व प्रस्तावांची छाननी करण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| क्र | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | जिल्हा पोलीस अधिक्षक | अध्यक्ष |
| २ | उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बा.क.), जिल्हा परिषद | सदस्य |
| ३ | संबंधित तालुका पोलीस स्टेशनचे पोलीस निरीक्षक | सदस्य |
| ४ | जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणच्या समाज कार्य महाविद्यालयाचे प्राचार्य (समाज कार्य महाविद्यालयनसल्यास महिला महाविद्यालयाचे प्राचार्च) (अध्यक्षांनी सूचविल्यानुसार ) | सदस्य |
| ५ | जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी महिलांसाठी कार्य करणा-या एका संस्थेचे अध्यक्ष किंवा सचिव (अध्यक्षांनी सूचविल्यानुसार ) | सदस्य |
| ६ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३०११६१२२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

***सही/-***
(जयंत जनबंधु)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई
विशेष पोलीस महानिरीक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष), गुन्हे अन्वेषन विभाग (गुन्हे),
संगमब्रीज, शिवाजी नगर, पुणे ४११ ००५

सर्व जिल्हा पोलीस आयुक्त,
सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक,
पोलीस उप आयुक्त (अंमलबजावणी), मुंबई.
मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बा.क.), जिल्हा परिषद
संबंधित तालुका पोलीस स्टेशनचे पोलीस निरीक्षक (संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
सर्व समिती अध्यक्ष व सदस्य (संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत )
राज्य समन्वयक (PPMU), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
टाटा सामाजिक विज्ञान संस्था, देवनार, मुंबई
निवड नस्ती, का.२,